प्रशासकीय मान्यता
यावल,जि.जळगांव येथे दिवाणी न्यायाधीश (क.स्त.)
यांच्यासाठी निवासस्थान बांधण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीआरक्यू-२००९/प्र.क्र.१६०/का-१३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:- ८ फेब्रुवारी,२०११.

पहा :- १) प्रबंधक (निरीक्षण-दोन), उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई यांचे पत्र क्र .बी(डब्ल्यु)६०९५/२००९, दिनांक १७ सप्टेंबर,२००९,
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जळगांव यांचे पत्र क्र.एचकेडब्ल्यू-८०८५/२००९, दि. ३ ऑगस्ट,२००९.

**शासन निर्णय** :- यावल, जि.जळगांव येथे दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) यांच्यासाठी निवासस्थान बांधण्यास येणा-या रु. ११,५८,२६०/- (रुपये अकरा लक्ष,अठ्ठावन हजार,दोनशे साठ फक्त) इतक्या अंदाजित खर्चास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

( रुपये )

| अनुक्रमांक | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारत बांधकाम खर्च | ८,९६,८३२ |
| २ | विद्युतीकरण (११%) | ९८,६५२ |
| ३ | आकस्मिक खर्च ( ४%) | ३५,८७४ |
| ४ | बाहय पाणीपुरवठा आणि मलनिस्सारण (८ %) | ७१,७४७ |
| ५ | ५ % भाववाढीसाठी. | ५५,१५५ |
| | **एकूण** | **११,५८,२६०** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) काम सुरु करण्यापूर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबत खातरजमा करण्यात यावी.
(ब) मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांचेकडून मंजूर करुन घेऊनच काम सुरु करावे.

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६-गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-७०० इतर गृहनिर्माण (एक) न्यायदान- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-३२६/इमा-२, दि.२९ डिसेंबर,२००९ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. :-विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम

पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकाराान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी.

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण-दोन), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जळगांव,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगांव,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर )विभाग,जळगांव,
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग,यावल,जि.जळगांव,
जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव,
उप कोषागार अधिकारी, यावल,जि.जळगांव,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ प्रशासकीय इमारत, १९ वा मजला,मंत्रालयासमोर,मुंबई- ४०० ०३२,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.